GR-200504201126040001-0100

**महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२ अंतर्गत माहिती अधिकाऱ्याला नैसर्गिक न्यायाच्या तत्वानुसार अपिलीय प्राधिकाऱ्यांच्या आदेशाविरूद्ध दाद मागण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्र.ममाअ-२००५/प्र.क्र.०२/०५/५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१.३.२००५

**शासन परिपत्रक :-**

"महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२" मधील कलम ६(१) नुसार माहिती मिळवण्याची इच्छा असलेल्या व्यक्तीने विहित रितीने आणि विहित करण्यात येईल अशा शुल्कासह अशा नमुन्यात आणि अशा तपशीलासह शासकीय माहिती अधिकाऱ्याकडे अर्ज केल्यानंतर शासकीय माहिती अधिकाऱ्यांनी कलम ६(२) नुसार कार्यवाही करणे अपेक्षित आहे. तसे न केल्यास त्याच्यावर कलम १२(१) नुसार शास्ती लादली जाते. काही प्रकरणी अशी दंडात्मक कार्यवाही अनाठायी, आकसपूर्ण भावनेतून होण्याची शक्यता नाकारता येत नाही. विद्यमान अधिनियम, नियमात अशा प्रकारच्या अन्याय्य कारवाईविरूद्ध दाद मागण्यासंबंधात सुस्पष्ट असे प्रावधान नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आणण्यात आले आहे.

यासंदर्भात आता असे स्पष्ट करण्यात येत आहे की, महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२ मधील कलम ११(१) व (३) तसेच कलम १२(३) मधील तरतुदीनुसार 'कोणत्याही व्यक्तीस' अनुक्रमे अपील/दुसरे अपील करण्याचा अधिकार दिलेला आहे. यामध्ये शासकीय माहिती अधिकाऱ्याचाही समावेश होतो. त्यामुळे शासकीय माहिती अधिकाऱ्यांना अपिलीय प्राधिकाऱ्यांच्या निर्णयाने व्यथित झाल्यास अधिनियमातील कलम १२(३) प्रमाणे लोकआयुक्त/ उप लोक आयुक्त यांचेकडे अपील करता येईल. त्याचप्रमाणे नैसर्गिक न्यायाच्या तत्वानुसार सुद्धा माहिती अधिकाऱ्यास अपिलीय प्राधिकाऱ्याच्या निर्णयाविरूद्ध दाद मागण्याची मुभा असल्याने अशा प्रकरणी माहिती अधिकाऱ्यास अपिलीय प्राधिकाऱ्याच्या अन्याय्य निर्णयाविरूद्ध जरूर तर अपिलीय प्राधिकाऱ्याच्या वरिष्ठाकडेही दाद मागणे शक्य होईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वंदना कृष्णा)
शासनाचे सचिव

प्रत,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव,
*७) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
*८) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
*९) महाप्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
*१०) महाप्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
*११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*१३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) सर्व महामगरपालिका आयुक्त,
१७) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख,
१८) सर्व मंत्रालयीन विभाग, व सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१९)महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
*२०) राज्य स्तरीय परिषदेचे सर्व सदस्य.
२१) निवड नस्ती. (२ प्रती)

* (पत्राने)

---

C:\Sonawane\G.r.\42
रोटा/एच-05(4000-4-05).